**साथरोग नियंत्रण कार्यक्रमास शासन मंजुरी व कार्यक्रमांतर्गत औषध व साधन सामग्री खरेदीकरीता अर्थसंकल्पिय तरतूद करण्यास <u>मंजुरी देणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साथरो-२०१६/प्र.क्र.४२०/आरोग्य-५**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
तारीख : १ मार्च, २०१७.

<u>वाचा -</u>

१) दिनांक २८/०८/१९९१ रोजी राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीतील निर्णयाची प्रत.
२) सह संचालक, आरोग्य सेवा (हि.ह.व ज.रो.), पुणे यांचे पत्र क्र. संसआसे/साथरोग/साथरोग नियंत्रण कार्यक्रम/अनुदान/शासन निर्णय/कक्ष-५८/३१२४३-४६/२०१६, दि.१४/१०/२०१६ चे पत्र.

<u>प्रस्तावना -</u>

राज्यात उद्भवणाऱ्या साथरोगांवर सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिनस्त सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे यांचेमार्फत राज्यातील साथरोग परिस्थितीचे नियमित संनियंत्रण केले जाते. साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत प्रामुख्याने जलजन्य आजार, अतिसार, गॅस्ट्रो, विषमज्वर, जलजन्य कावीळ, लेप्टोस्पायरोसिस तसेच स्वाईन फ्ल्यू आजारांच्या नियंत्रणासाठी औषधे व साहित्य सामुग्रीची खरेदी करण्यात येते. दिनांक २८ ऑगस्ट, १९९१ रोजी झालेल्या राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीत साथरोग नियंत्रण कार्यक्रमाकरिता दरवर्षी अर्थसंकल्पिय तरतूद करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार प्रतिवर्षी साथरोग नियंत्रण कार्यक्रम योजनेकरिता (२२१० ४२८६-राज्य योजनांतर्गत योजना) या लेखाशिर्षांतर्गत (२१) पुरवठा व सामग्री या बाबीसाठी नियमित अर्थसंकल्पिय तरतूद केली जात आहे. मात्र, सन २०१७-१८ साठी साथरोग नियंत्रण कार्यक्रम योजनेकरिता अनुदानाची मागणी करताना वित्त विभाग व नियोजन विभागाने सदर योजनेच्या मंजुरीबाबतचा शासन निर्णय उपलब्ध करुन देण्याबाबत सूचना दिल्या आहेत.

दि. २८ ऑगस्ट, १९९१ रोजीच्या राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार साथरोग नियंत्रण कार्यक्रम योजनेकरिता (२२१० ४२८६-राज्य योजनांतर्गत योजना) या लेखाशिर्षांतर्गत (२१) पुरवठा व सामग्री या बाबीसाठी नियमित अर्थसंकल्पिय तरतूद केली जात आहे. ही योजना सद्यस्थितीत कार्यान्वित आहे, या योजनेसाठी नियमित अर्थसंकल्पित तरतूद देखील करण्यात येत आहे. मात्र, सदर योजनेचा स्वतंत्र असा शासन निर्णय उपलब्ध नाही. त्यामुळे या योजनेंतर्गत पुढील आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यास अडचण निर्माण झाली आहे. यास्तव, साथरोग नियंत्रण कार्यक्रमास शासन मंजुरी व सदर योजनेकरिता (२२१० ४२८६- राज्य योजनांतर्गत योजना) या लेखाशिर्षाखाली पुरवठा व सामग्री या बाबीसाठी नियमित अर्थसंकल्पिय तरतूद करण्यास शासन मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्यात वेळोवेळी उद्भवणाऱ्या साथरोगांवर उपाययोजना करण्याकरिता साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत प्रामुख्याने जलजन्य आजार, अतिसार, गॅस्ट्रो, विषमज्वर, जलजन्य कावीळ, लेप्टोस्पायरोसिस तसेच स्वाईन फ्ल्यू या सारख्या आजारांवर नियंत्रण आणण्यासाठी "साथरोग नियंत्रण कार्यक्रम (Control of Epidemic Diseases)" ही योजना राबविण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे. तसेच साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत (२२१० ४२८६-राज्य योजनांतर्गत योजना) या लेखाशिर्षांतर्गत औषधे व साहित्य सामुग्रीच्या खरेदीसाठी (२१) पुरवठा व सामग्री या बाबींखाली राज्य अर्थसंकल्पात नियमित अर्थसंकल्पिय तरतूद करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत औषधे व साहित्य सामुग्रीच्या खरेदीसाठी होणारा खर्च खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली त्या त्या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर- १
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
१०१, रोग प्रतिबंध व नियंत्रण,
०१, रोगप्रतिबंध व नियंत्रण,
(०१) (४५) साथरोग नियंत्रण कार्यक्रम (राज्य योजनांतर्गत योजना)
२१, पुरवठा व सामग्री
(२२१० ४२८६) (योजनांतर्गत)

साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत खरेदी करण्यात येणारी औषधे व साहित्य सामुग्री शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या प्रचलित नियमांनुसार करावी.

**<u>साथरोग नियंत्रण कार्यक्रमाचे स्वरुप/कार्ये :</u>**

साथरोग नियंत्रण कार्यक्रम या योजनेतंर्गत जलजन्य आजार तसेच नव्याने उद्भवणारे नवे-जुने साथीचे आजार /संसर्गजन्य आजार, प्रामुख्याने अतिसार, गॅस्ट्रो, विषमज्वर, जलजन्य कावीळ, लेप्टोस्पायरोसिस तसेच स्वाईन फ्ल्यू यांसारख्या साथरोग आजारांवर प्रतिबंध व नियंत्रण आणण्यासाठी प्रभावी उपाययोजना करणे. तसेच साथरोग प्रतिबंध/नियंत्रणासाठी औषधी व साहित्य सामग्रीची खरेदी करण्यात येते. सदर औषधे व साहित्य सामग्रीचे वितरण सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत कार्यरत आरोग्य संस्थांना करणे.

**<u>उद्दिष्टये :-</u>** राज्यात उद्भवणाऱ्या खालील साथरोगांना नियंत्रित करणे.

* जलजन्य आजार व इतर आजारांचे प्रतिबंध व नियंत्रण करणे.
* जिल्हास्तरीय आरोग्य यंत्रणेस वेळोवेळी आवश्यक त्या मार्गदर्शक सूचना देणे.
* ब्लिचिंग पावडर गुणवत्ता नियंत्रण, पाणी गुणवत्ता नियंत्रण.
* जलजन्य आजार टाळण्यासाठी सर्वसामान्य जनतेचे विविध माध्यमातून आरोग्य शिक्षण करणे.
* पाणीपुरवठा विभाग, ग्रामविकास आणि नगर विकास विभागाशी आंतरविभागीय समन्वय ठेवणे.

**लाभार्थी :-**

साथरोग नियंत्रण कार्यक्रम हा सार्वजनिक आरोग्याशी निगडीत महत्वाचा कार्यक्रम असल्याने राज्यातील संपूर्ण जनता ही या कार्यक्रमाची लाभार्थी आहे.

**अंमलबजावणी अधिकारी :-**

सह संचालक, आरोग्य सेवा (हि.ह. व ज.रो.), पुणे-६ हे "साथरोग नियंत्रण कार्यक्रम" (Control of Epidemic) या कार्यक्रमाचे अंमलबजावणी अधिकारी असतील. या योजनेकरिता उपलब्ध अनुदानाचा ताळमेळ राखण्यासाठी सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना "**नियंत्रक अधिकारी**" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर अनुदानाशी संबंधीत देयके कोषागार अधिकारी यांचेकडे सादर करण्यासाठी मुख्य प्रशासकीय अधिकारी, सहसंचालक, आरोग्य सेवा (हि.ह.व ज.रो.), पुणे-६ यांचे कार्यालय यांना **"आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने, वित्त विभाग, अर्थ-९ शाखेच्या अनौ.सं.क्र. १५३/अर्थ-९/१७, दि.१७/०२/२०१७ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०११६२८४४८३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: CN = Sanjay R More, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.03.02 14:46:30 +05'30'

**( सं. रा. मोरे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
६) मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

८) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
९) सहसंचालक, आरोग्य सेवा (हि.ह. व ज.रो.), पुणे.
१०) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
११) मुख्य प्रशासकीय अधिकारी, सहसंचालक (हि.ह.व ज.रो.) यांचे कार्यालय, पुणे-१.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१५) प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१६) वित्त विभाग, (व्यय-१३) (अर्थसंकल्प-९), मंत्रालय, मुंबई.
१७) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा)/(लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती (आरोग्य-५).